दिनांक 1-9-1983 रोजी सहाय्यक सचिव पदावर पदोन्नत झालेल्या सहायक सचिवांची वेतननिश्चिती.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय, क्रमांक: वेतन 1095/प्र.क्र.82/95/सेवा-3,
मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 17 नोव्हेंबर, 1995.

संदर्भ :- (1) शासन, निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: पीएवाय 1079/सीआर-1162/एसईआर-3, दिनांक 5 ऑगस्ट, 1983.

(2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: पीएवाय 1079/सीआर-1162/एसईआर-3, दिनांक 11 ऑगस्ट, 1983.

(3) सामान्य प्रशासन विभाग, आदेश क्रमांक: एसआरव्ही 1085/एक/86/चौदा, दिनांक 5 सप्टेंबर, 1988.

(4) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: वेतन 1088/प्र.क्र.751/सेवा-3, दिनांक 29 ऑगस्ट, 1989.

(5) सामान्य प्रशासन विभाग, आदेश क्र.ससप-1094/प्र.क्र.37-94/(2)/चौदा, दिनांक 21 जून, 1995.

शासन निर्णय

मंत्रालयाच्या विविध प्रशासकीय विभागांतील अधिक्षकांना दिनांक 1-9-1983 पासून सहाय्यक सचिव या पदावर पदोन्नती देण्यासंबंधीचे आदेश, सामान्य प्रशासन विभागाचे कार्यालयीन आदेश क्रमांक: ससप-1094/प्र.क्र.37-94/(2)/चौदा, दिनांक 21 जून, 1995 अन्वये निर्गमित करण्यात आले आहेत. या अधिक्षकांना सहाय्यक सचिव पदावर पदोन्नती दिल्यानंतर त्या पदावरील त्यांची वेतननिश्चिती कशी करावी हा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

2. शासन आता असे आदेश देत आहे की, संबंधित अधिका-यांची सहाय्यक सचिव पदावर 1-9-1983 रोजीची वेतननिश्चिती वर नमूद केलेल्या अनुक्रमांक 2 येथील वित्त विभागाच्या दिनांक 11 ऑगस्ट, 1983 च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वाच्या आधारे करण्यात यावी. अशी वेतननिश्चिती करताना वर नमूद केलेल्या अनु.क्रमांक 1 येथील वित्त विभागाच्या दिनांक 5 ऑगस्ट, 1983 च्या आदेशान्वये श्री. एस. ए. म्हात्रे, राज्य नियोजन अधिकारी, नियोजन विभाग यांना मंजूर केलेल्या रु.100 इतक्या विशेष वेतनाचा, सहाय्यक सचिव पदावरील वेतननिश्चितीसाठी अनुज्ञेय करण्यात आलेला लाभ या आदेशातील अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून याही प्रकरणी देण्यात यावा.

3. वर नमूद केलेली वेतननिश्चिती कार्यान्वित करण्यापूर्वी संबंधित प्रशासकीय विभागांनी वर नमूद केलेल्या अनुक्रमांक 5 येथील सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक 21 जून, 1995 च्या आदेशातील परिच्छेद 3 व 4 मध्ये सुचविल्याप्रमाणे सहाय्यक सचिवांची श्रेणी, अवनत केलेली पदे पुनश्च पुनरुज्जीवित करून त्यांची दिनांक 1-9-83 पासून सहाय्यक सचिव या पदात श्रेणीवाढ करावी.

4. सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक 21 जून, 1995 च्या आदेशात स्पष्ट केल्याप्रमाणे अधीक्षकाचे वेतन त्यांना सहाय्यक सचिव संवर्गात देण्यात आलेल्या पदोन्नतीच्या दिनांकास ते प्रत्यक्ष पदोन्नत झाले आहेत असे गृहीत धरून त्या दिनांकापासून पुनर्निश्चित करावे. मात्र त्यांच्या सुधारित वेतननिश्चितीमुळे त्यांना त्या कालावधीतील थकबाकी देय होणार नाही.

सहायक सचिव पदावी दिनांक 1-9-1983 पासून काल्पनिक वेतननिश्चिती केल्यानंतर जे अधिकारी नंतर अवर सचिव पदावर पदोन्नत झाले असतील, त्यांना, त्यांनी अवर सचिव पदाचा पदभार ज्या दिवसापासून ग्रहण केला असेल त्या दिवसापासून त्यांचे अवर सचिव पदाचे वेतन निश्चित करावे व त्यांना त्याबाबतची थकबाकी प्रदान करण्यात यावी. मात्र अशी दिनांक 31 ऑगस्ट, 1995 पर्यन्तची थकबाकी संबंधित अधिका-यांच्या भविष्य निर्वाह निधी खात्यामध्ये जमा करण्यात यावी.

5. महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, 1988 नुसार दिनांक 1 जानेवारी, 1986 पासून सुधारित करण्यात आलेल्या सहायक सचिव पदाच्या वेतनश्रेणीबद्दलचा विकल्प संबंधित व्यक्तींनी हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून 3 महिन्यांच्या आत द्यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श. वि. लागवणकर,
उप सचिव, वित्त विभाग.

प्रत,

महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-1, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मंत्रालयातील सर्व विभाग,
सामान्य प्रशासन विभाग (चौदा),
वित्त विभाग, कार्यासन, प्रशासन 1./सेवा-10,
निवड फाईल, एसईआर-3.

---

एच-1195(6000+40-11-95)-अ.